राष्ट्रीय विकलांग वित्त व विकास निगम या केंद्र शासनाच्या उपक्रमाच्या योजनांच्या अंमलबजावणीसाठी राज्य मंडळाची स्थापना करण्याबाबत..

महाराष्ट्र शासन
सामाजिक न्याय,सांस्कृतिक कार्य,व विशेष सहाय्य विभाग,
शासन निर्णय: क्रमांक:अपंग २००३/प्र.क्र.२५५/सुधार-३
मंत्रालय विस्तार भवन,मुंबई-४०००३२.
दिनांक: ११ फेब्रुवारी,२००४.

वाचा: १) राष्ट्रीय विकलांग वित्त व विकास निगम, फरीदाबाद यांचे क्रमांक एनएचएफ-१/३/जीईएन/ २००३/१९७६१, दिनांक २६.८.२००३ रोजीचे पत्र.
२) सचिव, सामाजिक न्याय व अधिकारिता मंत्रालय,भारत सरकार, नवी दिल्ली यांचे क्रमांक-३-१४/२००३-एनआय-२, दिनांक २०.१०.२००३ रोजीचे पत्र.
३)राष्ट्रीय विकलांग वित्त व विकास निगम, फरीदाबाद यांचे क्रमांक एनएचएफ-१/३/१/ स्टेट फोरम/२००४/२१९१७, दिनांक २.१.२००४ चे पत्र.

शासन निर्णय:- राष्ट्रीय विकलांग वित्त व विकास निगम,फरीदाबाद या केंद्र शासनाच्या अंगीकृत उपक्रमामार्फत अपंगांसाठीच्या आर्थिक सहाय्याच्या ज्या योजना राबविल्या जातात त्यांचा लाभ राज्यांतील सर्वदूर क्षेत्रांतील तळागाळाच्या अपंगांपर्यन्तही पोहोचावा तसेच सदर योजनांची अंमलबजावणी प्रभाविपणे व्हावी यादृष्टीकोनातून केंद्र शासनाच्या वरील उपक्रमाच्या सूचनेनुसार राज्य मंडळ स्थापन करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. आता या शासन निर्णयान्वये खालीलप्रमाणे राज्य मंडळ स्थापन करण्यांत येत आहे:-

| | |
|---|---|
| १) प्रधान सचिव( सामाजिक न्याय) | अध्यक्ष |
| २)व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळ | सदस्य |
| ३)व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ | सदस्य |
| ४)व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र लघु उद्योग विकास महामंडळ | सदस्य |
| ५)श्रीमती भारती पालेकर, जय वकील स्कूल फॉर चिल्ड्रेन नीड फॉर स्पेशल केअर शिवरी हिल,मुंबई | सदस्य |
| ६)श्री. मिरजकर, फेलोशिप ऑफ दि फिजिकली हॅण्डीकॅप्ड रेसकोर्स जवळ, महालक्ष्मी,मुंबई | सदस्य |
| ७)प्रकल्प संचालक, डिस्ट्रीक्ट रिहॅबिलिटेशन सेंटर,विरार,ठाणे | सदस्य |
| ८) आयुक्त, अपंग कल्याण, महाराष्ट्र राज्य,पुणे | सदस्य-सचिव |

सदर राज्य मंडळाची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहिल :-

१) अपंगांच्या क्षेत्रात कार्य करणा-या संस्था/व्यक्ती यांना संघटीत करुन अपंगांना स्वयंरोजगारासाठी प्रवृत्त करणे.
२) अपंग व्यक्तींमध्ये स्वयंरोजगाराची भावना वाढीस लागावी यासाठी कृति आराखडा तयार करणे.
३) कृति आराखडयाच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी विविध उपाय योजना तयार करणे.

४) राष्ट्रीय अपंग वित्त व विकास निगम या उपक्रमाच्या योजनाच्या अंमलबजावणीत होणा-या प्रगतीबाबत संनियंत्रण ठवणे.

५)केंद्र शासनाच्या वरील उपक्रमाच्या योजना जास्तीत जास्त अपंगांना माहिती होतील यासाठी प्रयत्न करणे.

७)अपंगांच्या क्षेत्रात कार्य करणा-या स्वयंसेवी संस्था व सर्व शासकीय विभाग यांच्यामध्ये समन्वय साधणे.

८) अपंगांना रोजगाराच्या संधी प्राप्त करुन देण्यासाठी जिल्हा प्रशासनाकडून प्रभावी प्रयत्न केले जातील हे पहाणे.

९)याखेरीज राज्य मंडळास योग्य वाटतील अशा बाबी.

२. वरील समितीतील सदस्यांना कोणत्याही प्रकारचा प्रवास भत्ता, दैनिक भत्ता, बैठक भत्ता अथवा अन्य कोणताही भत्ता अनुज्ञेय नाही. मात्र समितीच्या उद्दीष्टांच्या परिपूर्तीसाठी प्रवास करणे आवश्यक झाल्यास समितीवरील ज्या शासकीय अधिका-यांना वाहन अनुज्ञेय आहे, त्यांनी अशासकीय सदस्यांना त्यांच्या वाहनात समाविष्ट करुन घ्यावे. समितीने केलेल्या कार्यवाहीचा अहवाल राज्य शासनास तसेच केंद्र शासनाच्या वरील उपक्रमास वेळोवेळी पाठवावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( वि. द. आठवले )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रतिः
व्यवस्थापकीय संचालक, राष्ट्रीय विकलांग वित्त व विकास निगम,
रेड क्रॉस भवन, सेक्टर-१२, फरिदाबाद-१२१००७.
आयुक्त, अपंग कल्याण, महाराष्ट्र राज्य,पुणे
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळ,मुंबई.
व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ,मुंबई.
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र लघु उद्योग विकास महामंडळ,मुंबई.
प्रकल्प अधिकारी, महाराष्ट्र लघु उद्योग विकास महामंडळ.( सर्व जिल्हे)
श्रीमती भारती पालेकर, जय वकील स्कूल फॉर चिल्ड्रेन नीड फॉर स्पेशल केअर शिवरी हिल,मुंबई
श्री. मिरजकर, फेलोशिप ऑफ दि फिजिकली हॅण्डीकॅप्ड्, रेसकोर्स जवळ, महालक्ष्मी,मुंबई
प्रकल्प संचालक, डिस्ट्रीक्ट रिहॅबिलिटेशन सेंटर,विरार,ठाणे
मा. मंत्री (सामाजिक न्याय) यांचे खाजगी सचिव
मा. राज्यमंत्री (सामाजिक न्याय) यांचे खाजगी सचिव
प्रधान सचिव (सामाजिक न्याय) यांचे स्वीय सहाय्यक
सर्व मंत्रालयीन विभाग.
निवड नस्ती का. सुधार-३.